**पाटबंधारे प्रकल्पांची सिंचन विषयक कामगिरी सुधारण्यासाठी सिंचन स्थितीदर्शक अहवाल, जललेखा अहवाल, व स्थिरचिन्हांकन अहवालावर आधारित कार्य नियोजन आराखडा (Work Plan) तयार करून त्यानुसार कार्यवाही करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीडीए-२०१८/प्र.क्र.१९२/१८/लाक्षेवि (कामे)**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०६ फेब्रुवारी, २०१९

वाचा : १) शासन परिपत्रक क्र. प्रमा-२०१३/(७८५/१३)/सिंव्य (कामे), दि. ०१.०१.२०१५
२) शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१६/(८८/१६)/सिं.व्य. (कामे), दि. ०९.०५.२०१६

**प्रस्तावना :-**

राज्याच्या जलनितीमध्ये पाटबंधारे प्रकल्पातील उपलब्ध पाण्याचा काटकसरीने वापर करुन धान्य उत्पादनात अधिकाअधिक वाढ व्हावी, अशी अपेक्षा व्यक्त करण्यात आली आहे. महाराष्ट्र राज्यामध्ये, आजतागायत विविध मोठया, मध्यम व लघु पाटबंधारे प्रकल्पांची निर्मिती करण्यात आली आहे.

जून २०१७ अखेर राज्यात ५०.४२ लक्ष हे. सिंचन क्षमता निर्माण झाली असून धरणातून उपलब्ध झालेल्या पाण्यातून वर्ष सन २०१७-१८ मध्ये प्रत्यक्ष सिंचित झालेले क्षेत्र ३९.५३ लक्ष हे. एवढे आहे. राज्यातील प्रकल्पांचे निर्मित सिंचित क्षेत्र टप्याटप्याने पाणीवापर संस्थेस हस्तांतरण करणे बंधनकारक आहे. निर्मित सिंचन क्षमतेपैकी मार्च, २०१८ अखेर एकूण ११.४९ लक्ष हे. ऐवढे क्षेत्र पाणीवापर संस्थांना हस्तांतरित करण्यात आले आहे. उर्वरित क्षेत्र पाणीवापर संस्थाना लवकरात लवकर हस्तांतरित करणे आवश्यक आहे.

राज्यातील पाटबंधारे प्रकल्पांचे स्थिरचिन्हांकन करण्यास सन २००१-२००२ पासून सुरुवात करण्यात आली आहे. त्यावेळी ८४ प्रकल्पांचे स्थिरचिन्हांकन करण्यात आले होते. पाटबंधारे प्रकल्प जसजसे पूर्ण होतील त्याप्रमाणे यामध्ये वाढ होऊन सन २०११-१२ या वर्षात १३३५ पाटबंधारे प्रकल्पांचे तर २०१२-१३ या वर्षात २२६ पाटबंधारे प्रकल्पांचे स्थिरचिन्हांकन करुन अहवाल प्रकाशित करुन शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला आहे. पुढील अहवाल देखील प्रकाशित करण्यात येत आहेत.

पाटबंधारे प्रकल्पांच्या कामगिरीमध्ये सुधारणा घडवून आणणे हा स्थिरचिन्हांकनाचा मुख्य उद्देश आहे. यात मोठया व मध्यम पाटबंधारे प्रकल्पांची कामगिरी तपासण्यासाठी बारा निर्देशांक (Indicators) तर लघु प्रकल्पांसाठी ४ निर्देशांक व त्यांची मुल्ये निश्चित करण्यात आली आहेत. पाटबंधारे प्रकल्पांच्या कामगिरीमध्ये सातत्याने वाढ होण्यासाठी निर्देशांक मूल्यांच्या आधारे प्रकल्पांची स्वत:ची गेल्या पाच वर्षातील कामगिरीशी

तसेच महामंडळातील त्यांचे योजना गटामधील (Plan-Group) इतर प्रकल्पांशी तुलना करुन कामगिरी वाढविण्यासाठी प्रयत्न करणे अपेक्षित आहे. सदर कामगिरी शासनाने विविध दर्शकांसाठी निश्चित केलेल्या किमान मूल्याइतकी असणे आवश्यक आहे. सन २००२ पासुन राज्यातील सर्व मोठे, मध्यम व लघु पाटबंधारे प्रकल्पांचे जललेखा परीक्षण केले जाते. त्या करिता शासनाने निर्देशांक निश्चित केले असून त्यानुसार प्रकल्पांचे लेखा परीक्षण करुन सर्व प्रकल्पांचा एकत्रित जललेखा अहवाल प्रतिवर्षी तयार करुन प्रसिध्द केला जातो. सन २०११-१२ पर्यंत प्रकाशित केलेले जललेखा अहवाल संकेतस्थळावर उपलब्ध आहेत. पुढील अहवाल देखील प्रकाशित करण्यात येत आहेत.

स्थिरचिन्हांकन अहवालांमध्ये शासनाने निश्चित करुन दिलेल्या विविध निर्देशांक मूल्यांशी प्रकल्पाची तुलना करुन प्रत्येक प्रकल्पामध्ये ज्या निर्देशांकात सुधारणा करण्याची गरज आहे, अशा निर्देशांकासंबंधित कामगिरीमध्ये सुधारणा करण्यासाठी, निदर्शनास आलेले निष्कर्ष (Findings) यांचा अहवालात अंतर्भाव करण्यात आला आहे. या आधारे संबंधित प्रकल्प अधिकाऱ्यांनी (कार्यकारी अभियंता व अधीक्षक अभियंता) त्यांचे कार्यक्षेत्रातील पाटबंधारे प्रकल्पांच्या निर्देशांक मूल्यांच्या आधारे व निष्कर्षांच्या आधारे प्रकल्पाचे कामगिरीत सुधारणा करण्यासाठी कार्य नियोजन आराखडा (Work Plan) तयार करुन तो राबविणे आवश्यक होते. तथापि बहुसंख्य प्रकल्प अधिकाऱ्यांकडून कार्य नियोजन आराखडा तयार करण्यात आला नसल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे.

उपरोक्त पार्श्वभूमीचा विचार करता, सिंचन स्थितीदर्शक अहवाल, जललेखा अहवाल व स्थिरचिन्हांकन अहवालातील प्रसिध्द झालेल्या निष्कर्षानुसार आवश्यक कार्यवाही क्षेत्रीय स्तरावरुन करण्यात यावी, तसेच पाटबंधारे प्रकल्पांची सिंचन विषयक कामगिरी सुधारण्यासाठी, सिंचन स्थितीदर्शक अहवाल, जललेखा अहवाल व स्थिरचिन्हांकन अहवालावर आधारित कृती आराखडा तयार करुन त्यानुसार कार्यवाही करण्याच्या सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार सिंचन स्थितीदर्शक अहवाल, जललेखा अहवाल व स्थिरचिन्हांकन अहवाल यावर आधारित कार्य नियोजन आराखडा तयार करणेबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यातील पाटबंधारे प्रकल्पांचा सिंचन स्थितीदर्शक अहवाल, जललेखा अहवाल व स्थिरचिन्हांकन अहवाल यापूर्वी तत्कालीन मुख्य अभियंता, महाराष्ट्र जलसंपत्ती विकास केंद्र, औरंगाबाद यांचेमार्फत प्रसिध्द करण्यात येत होते. आता सदर अहवाल मुख्य लेखा परीक्षक, जल व सिंचन, महाराष्ट्र राज्य, औरंगाबाद यांचेमार्फत प्रसिध्द केले जातात. सदर अहवाल प्रतिवर्षी प्रसिध्द होणे आवश्यक असून याकरिता क्षेत्रीय कार्यालयांनी अहवाल तयार करण्यासाठी आवश्यक माहिती विविध प्रपत्रांमध्ये विहित मुदतीत सादर करणे

आवश्यक आहे. या अहवालाकरिता क्षेत्रीय कार्यालयांनी सादर करावयाची प्रपत्रे मुख्य लेखा परीक्षक, जल व सिंचन, महाराष्ट्र राज्य, औरंगाबाद यांनी अंतिम केली असून क्षेत्रीय कार्यालयाने आवश्यक माहिती सादर करण्याच्या तारखा शासनाने पुढीलप्रमाणे निश्चित केल्या आहेत.

| **अहवाल** | **माहिती सादर करण्याचा अंतिम दिनांक** | **अहवाल प्रसिध्द करण्याचा दिनांक** | **जबाबदार क्षेत्रीय अधिकारी** |
|---|---|---|---|
| सिंचन स्थितीदर्शक अहवाल | ३१ जुलै | १५ सप्टेंबर | मुख्य अभियंता |
| जललेखा अहवाल | १४ ऑगस्ट | २२ मार्च | मुख्य अभियंता |
| स्थिरचिन्हांकन अहवाल | ३० सप्टेंबर | २२ मार्च | मुख्य अभियंता |

क्षेत्रीय अधिकाऱ्यांकडून आवश्यक माहिती प्राप्त करुन घेऊन वर नमूद केलेली माहिती सादर करण्याच्या अंतिम दिनांकापर्यत, मुख्य लेखा परीक्षक यांना माहिती सादर करण्याची जबाबदारी संबंधित मुख्य अभियंता यांची राहील. तसेच वर निर्देशित दिनांकास अहवाल प्रसिध्द करण्याची जबाबदारी मुख्य लेखा परीक्षक यांची राहील. मुख्य अभियंता यांनी माहिती सादर करतांना त्याची मंडळ स्तरावरुन सखोल तपासणी करुन व तसे प्रमाणित करुनच सादर करावी. सिंचन स्थितीदर्शक अहवाल व जललेखा अहवालामधील सादर होणारी माहिती निर्मित सिंचन क्षमता, हंगामनिहाय व पीकनिहाय सिंचित क्षेत्र, विविध प्रयोजनांसाठी होणारा पाणीवापर इत्यादी माहिती कार्यकारी अभियंता व अधीक्षक अभियंता यांनी पडताळणी करुन व प्रमाणित करुन देणे आवश्यक राहील.

मुख्य लेखा परीक्षक, जल व सिंचन, महाराष्ट्र राज्य, औरंगाबाद यांनी तयार केलेल्या स्थिरचिन्हांकन अहवालामध्ये नमूद केलेल्या निर्देशांकाचे अनुषंगाने व प्रकल्प अधिकाऱ्यांनी या दृष्टीने प्रकल्पाची पाहणी करुन प्रकल्पांची कार्यक्षमता वाढीच्या दृष्टीने शासन परिपत्रक दि. ०१.०१.२०१५ मध्ये विशेष दुरुस्ती व विस्तार सुधारणा अंतर्गत घ्यावयाच्या कामांबाबत मार्गदर्शक सूचना नमूद केल्या आहेत. त्यानुसार कार्य नियोजन आराखडा (Work Plan) तयार करावा.

शासन निर्णय दि. ९.५.२०१६ नुसार **नियमित** देखभाल व दुरुस्तीची कामे करण्यासंदर्भात सविस्तर सूचना देण्यात आल्या आहेत. त्यानुसार प्रतिवर्षी कामांचा आराखडा करण्यात यावा.

उपरोक्त दोन्ही नमूद शासन परिपत्रक/निर्णयानुसार तयार केलेल्या कामाच्या आराखडयानुसार काम केल्यास निधीचा इष्टतम विनियोग होवून सिंचन व्यवस्थापनाची कार्यक्षमता वाढविता येईल. तसेच स्थिरचिन्हांकन अहवाल व जललेखा अहवालातील महत्वाचे निर्देशांक उदा. प्रकल्पाची कार्यक्षमता (System Perfermance), प्रती घनमीटर पाणी वापरातुन भिजणारे क्षेत्र इ. मध्ये सुधारणा होईल. कार्यकारी अभियंता /

अधीक्षक अभियंता, यांचेकडून प्रतिवर्षी प्रकल्पांचा कार्य नियोजन आराखडा (Work Plan) तयार करुन त्यांची अंमलबजावणी क्षेत्रीय स्तरावर योग्य पध्दतीने करुन घेण्याची जबाबदारी संबंधीत मुख्य अभियंता यांची असेल. दरवर्षी जून अखेर त्यांनी कार्य नियोजन आराखडयामुळे होणाऱ्या निर्देशांकातील सुधारणांचे संनियत्रण करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असुन त्याचा सांकेतांक क्रमांक २०१९०२०६१४५८४२९६२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravikumar Gajanan Parate

Digitally signed by Ravikumar Gajanan Parate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=23d366e52e6a048879b9d5953c809241c7dcd02fe6faac978eb525e0aea4645d, serialNumber=662b83135b2cce1e0ab7818335e766c784d038dfa19bef1a58bc1968dd550d40, cn=Ravikumar Gajanan Parate
Date: 2019.02.06 15:02:32 +05'30'

(र. ग. पराते)
शासनाचे उप सचिव

**प्रति,**

१) सर्व पाटबंधारे महामंडळे
२) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
३) सर्व अधिक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
४) सर्व कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग.
५) जलसंपदा विभाग/लाक्षेवि (कामे) संग्रहार्थ.